# पाऊस येणार आहे

विनायक

अनुवाद : माया जाधव

चित्रे : पुलक विश्वास



नेहरू बाल पुस्तकालय

# पाऊस येणार आहे

**विनायक**

अनुवाद
**माया जाधव**

चित्रे
**पुलक विश्वास**






नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

*नोट* : अनुवादित पुस्तक 'पाऊस येणार आहे' या पुस्तकात 'शेर' या हिंदी शब्दाचा शब्दकोश-अर्थ 'सिंह' आहे. परंतु पुस्तकीय संदर्भ व चित्रांनुसार 'वाघ' शब्दाचा प्रयोग केला आहे. तसेच आपण नेहमी 'शेर आया'चा अर्थ 'वाघ आला' असाच घेतो. 'सिंह आला' असं म्हणत नाही. तसेच या संदर्भात लेखकाशीही चर्चा केली आहे. त्यानुसार वाघ या शब्दाचा प्रयोग केला आहे.

धन्यवाद



ISBN 978-81-237-7994-2

प्रथम प्रकाशन : 2017 (*शके* 1939)



Pani Barasane Wala Hai (*Hindi Original*)
Paaus Yenar Ahe (*Marathi Translation*)

**₹ 70.00**

संचालक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया
नेहरू भवन, 5 इन्स्टिट्युशनल एरिया, फेज–II
वसंतकुंज, नवी दिल्ली 110070 यांनी प्रकाशित केले.
www.nbtindia.gov.in

त्या वाघासाठी
ज्याला जीम कार्बेटने
झोपेतच मारले होते.*



*अल्मोडा जिल्ह्यातील मोहन वन-क्षेत्रात एका वाघाने साळिंदरला पकडताना त्याच्या छातीत २५-३० काटे घुसले होते आणि ते आतच रुतून राहिले होते. कालांतराने ती जखम चिघळू लागते आणि त्यामुळे वाघ चालताना कण्हत असे. नंतर हळूहळू वाघाला आपली नैसर्गिक शिकार करणेही अशक्य होवू लागले. असं म्हणतात की तो वाघ नरभक्षी झाला. जीम कार्बेटने जेव्हा त्याला पाच फुटावरून गोळी मारली तेव्हा तो आकाशाकडे तोंड करून निपचित झोपला होता आणि त्याचे पोट श्वासोच्छवासाने वर-खाली होत होते. डोक्यात गोळी लागल्याने त्याच्या पोटाची हालचाल एकदम बंद झाली.*

*एका नरभक्षी श्वापदाला झोपेतच मारल्याचा पश्चाताप जीम कार्बेटला निश्चित झाला, पण जर त्याने त्या वाघाला सोडले तर .....?*

*त्या वाघाबद्दल माझ्या मनात सहानुभूती आहे, कारण नरभक्षी होणं ही त्या वाघाची नियती होती आणि म्हणूनच त्याला मनुष्याच्या वाटेला अनिच्छेने जावे लागले होते.*

संदर्भ : *मैन ईटर्स ऑफ कुमाऊ*, जीम कार्बेट, अध्याय : ५, *द मोहन मैन ईटर*



त्या दिवशी अजिबात धुकं नव्हतं. सकाळची सोनेरी सूर्य-किरणं झाडांमधून क्षणोक्षणी वाघाच्या गुहेला चारही बाजूंनी प्रकाशमान करत होती. वाघ आणि वाघीण दोघेही आपली झोप पूर्ण करून गुहेच्या बाहेर येऊन बसले होते, परंतु त्यांचा मुलगा आणि मुलगी आपले चारही पाय वरती करून अजूनही गुहेतच झोपले होते.

त्यावेळी तेथून अस्वल जात होते. वाघ दाम्पत्याला पाहून हसत-हसत ते त्यांच्याकडे आले. अस्वलाला पाहून वाघ दाम्पत्याच्या चेहऱ्यावर स्वागताची प्रसन्न मुद्रा पसरली, परंतु त्याचवेळी दोघांची नजर अस्वलाच्या पाठीमागून येणाऱ्या अस्वलिनीवर जेव्हा पडली तेव्हा दोघेही एकदम उठून उभे राहिले. "या! या, घरात आपले स्वागत आहे".

अस्वल जोरात हसून म्हणाले, "जंगलात राजाच स्वागत करतोय यापेक्षा मोठी गोष्ट अजून काय असू शकते!"

"खरं तर तू हा तुझ्या पत्निचा सन्मान समझं!" असं म्हणत वाघसुद्धा जोरात हसू लागला.

"आज एवढ्या सकाळी-सकाळी ही श्यामल जोडी कुठे निघाली आहे?" वाघिणीने अस्वलाकडे पाहून प्रश्न विचारला.

"काही नाही जंगली बोरांचा फलाहार करण्यासाठी चाललो आहे," असं म्हणत अस्वल आपल्या अस्वलीनीकडे पाहू लागला आणि आपल्या उत्तराच्या समर्थनाची वाट पाहू लागला.

"मासे खाऊन-खाऊन कंटाळा आला आहे."

अस्वलीन अस्वलाला निराश न करता त्याचा म्हणण्याला दुजोरा देत म्हणाली, "विचार केला की आज जरा फळं-फुलं खावीत"

"तुम्हां लोकांचा हिशोब-बिशोब अगदी चांगला आहे," वाघीणसुद्धा हसली. "दोन्ही प्रकारच्या आहाराचा आनंद घेता! फलाहार आणि मासांहारही."

"आता काय करणार! वाघासारखं थोडचं आहे. जेव्हा मनात येईल तेव्हा पटकन पळत जाऊन एखाद हरीण पकडलं," अस्वल हसून म्हणाले. "जंगली बोरं खाऊनही दिवस काढावे लागतात."

"पाहिजे तर तुम्ही दोघंही येऊ शकता," अस्वलीनीने वाघ आणि वाघीण दोघांना येण्याचं आमंत्रण दिलं. "यावेळी तुम्हाला जंगली बोरांच्या झाडांमध्ये गुडगुड करणारा डुकरांचा परिवारही अवश्य दिसेल."

"नको बाबा, तो तर भूक भागवायचा सगळ्यात शेवटचा उपाय आहे," वाघ एकदम पश्चाताप करत म्हणाला. "त्यांना फक्त छू म्हटलं की सगळं जंगलच डोक्यावर घेतात, असं वाटतं कुठून ही झंझट बोलावली," वाघ हसून म्हणाला.

"चला मगं निघू या," अस्वल आणि अस्वलिन हसून वळाले आणि जणु काही दोन मोठ्या काळ्या चेंडूसारखे गडगडत निघून गेले. काही अतंर लांब गेल्यावर अस्वलाने मागे वळून जवळजवळ ओरडूनच सांगितले, "संध्याकाळी नदीकाठच्या धबधब्याजवळ भेटूया."

दिवसभर सर्वत्र प्रकाश पसरविल्यानंतर सूर्याचा आजचा प्रवास आता संपणार होता. चारही दिशांचे डोंगर-पर्वत एक-एक करून निरोप देवू लागले होते, परंतु काही सुवर्ण किरणे अजूनही झऱ्यातील पाण्याच्या वेगाबरोबर नदीत उड्या घेत-घेत लाटांना मिठ्या मारतं होती. ज्या ठिकाणी धबधबा हाहाकारपणे कोसळत होता तिथेच मासेसुद्धा कळपाने पाण्यावर उड्या मारत होते. अस्वलाला आपलं शरीर जराही हलवावं-डोलवावं लागत नव्हतं, परंतु मासे मात्र हवेतूनच त्याच्या हातात पडत होते. कधी तोंडात, कधी गळ्याखाली, तर कधी पोटातच गडप होत होती. अस्वलिन आपल्या शरीराची चादर पाण्याने पूर्णपणे अच्छादित करून नदी-किनाऱ्यावर सुस्तपणे पडून डुलक्या घेत होती. जेव्हा ती थकली, तेव्हा तिच्या प्रिय पतीने भरपूर मासे तिच्यापुढे खायला आणून टाकले आणि एक आदर्श जोडीदार असल्याचा प्रत्यय दिला.

त्याचवेळी तेथे राजा आणि राणीचे आगमन झाले. अस्वलाने नदीत असतानाच डोकं वर काढून पाहिलं आणि स्मित हास्य केलं. मग आठ-दहा मासे पकडून आणले आणि एक-एक करून त्यांच्यासमोर ठेवले आणि नंतर अतिशय आदबीने म्हणाला, "राजा-राणीसाठी ही छोटीशी भेट."

परंतु वाघाने काहीशी काळजी दाखवत अस्वलिनीकडे बघितले आणि विचारले, "ही अशी सुस्त का पडली आहे?"

"काही नाही! मी तिला मासे थोडे जास्तच खायला घातले, बस इतकचं!" काळा जीव (अस्वल) आश्वस्त करत म्हणाला, "काळजी करण्याचं काहीच कारण नाही."

"चला, इथून दूर जाऊन बोलूया. इथे यांच्या आरामात व्यत्यय नको." वाघ काहीसं काळजीने म्हणाला. तिघंही दूर जाऊन उभे राहिले.

अस्वलाने इकडे-तिकडे पाहून विचारले, "मुलगा आणि मुलीला नाही आणलं?"

"परत जाण्याचे काही निश्चित नव्हते! म्हणून मुलांना गुहेतच सुरक्षित ठेवणं योग्य वाटलं." वाघ काहीसा विचारमग्न होत नाईलाजाने म्हणाला.

"योग्यच केलतं!" अस्वल समर्थन देत म्हणाले. "आता जंगल हे पाहिल्यासारखे नाही राहिलं." तर अस्वलिनीकडे पाहून म्हणाला, "आता हिलाही उठवून आम्हीदेखील गुहेकडे निघतो. पोहोचता-पोहोचता अंधार तर होईलच."

"लवकर निघालात तर फार बरं होईल." वाघाच्या सुचविण्यात आग्रहाचा भाव दिसून येत होता.

आतापर्यंत वाघीण हळूच अस्वलिनीच्या डोक्याजवळ जाऊन बसली होती. का कोण जाणे ती तिच्या कृष्ण वर्णाकडे पाहून कातर होवू लागली व प्रेमाने मोहित होऊन तिने हळूच आपला चेहरा त्या कृष्णवर्ण सुंदरीच्या चेहऱ्यावर ठेवला. तिला ती झोपलेली अस्वलिन खूपच सुंदर वाटत होती.

अस्वलिनीने घाबरून अचानक आपलं डोकं उचललं. दूरवर उभे राहिलेले वाघ आणि अस्वल या दोघींचा प्रेम-मिलाफ पाहून हसू लागले.

"कळलचं नाही एवढी गाढ झोप कशी लागली ते!" अस्वलिन असं काही बोलू लागली की जणू काही आपल्याकडून घडलेल्या अपराधाचे समर्थनच देत आहे. तिने अस्वलाला जवळ-जवळ रागातच विचारलं, "तुम्ही मला उठवलं का नाही?"



"आम्ही सर्वांनीच त्यांना असं न करण्यासं भाग पाडलं." वाघीण अचानक मध्यस्थी करत बोलली, "आम्हांला काळजी वाटत होती की तू इतकी सुस्त का आहेस?"

"मी एकदम चांगली आहे! काळजी नका करू!" अस्वलिन एकदम हसून म्हणाली. "कितीतरी वेळ मीसुद्धा या धबधब्याखाली मासे पकडत होते."

गप्पांमध्ये प्रेमाच्या गोष्टी इतक्या रंगल्या होत्या की दोन्ही जोड्या वेगळं व्हायला तयारच नव्हत्या, परंतु पसरलेल्या अंधाराने त्यांना जाणीव करून दिली की आता आपण आपल्या रस्त्याने जायला पाहिजे.

त्या दिवशी रात्री वाघाने उशिरा एका खूप मोठ्या सांभराची शिकार केली. सांभर म्हणजे हरणाच्या जातीतील सर्वांत मोठी समजल्या जाणाऱ्या जातीची शिकार आणि तीसुद्धा आपल्या गुहेच्या खूप दूर जाऊन केलेली होती. जेव्हा वाघ आणि वाघिणीने पोट भरून शिकारीवर ताव मारला जेव्हा वाघाने वाघिणीला सुचविले, की धडाचा पुढचा काही भाग मुलांसाठी घेऊन जाऊ. इतकी मोठी शिकार इतक्या लांब गुहेपर्यंत घेऊन जाणं जवळ-जवळ अशक्यच होतं, परंतु वाघिणीचे मत होतं, की जिथं शिकार मारली होती तिथचं मुलांना घेऊन यावं. त्याचबरोबर रात्रभर तिथंच राहून शिकारीचीही राखण करावी. हे स्पष्ट होतं की वाघाचं कुटुंब इतकी मोठी शिकार एका दिवसात तर खाऊ शकणार नव्हतं आणि समजा शिकारीचा काही भाग जर तिथं असुरक्षित ठेवला तर सकाळ होताच काही मांस-भक्षक पक्षी ती शिकार खाऊन टाकतील.

परंतु वाघ इतक्या कमी शिकारीसाठी ही जोखीनं घ्यायला तयार नव्हता.



दुसऱ्या दिवशी दिवस उगवल्यानंतरही उशिरापर्यंत झोपल्यामुळे वाघ व वाघिणीने शिकारीकडे जाण्यास कंटाळा केला. बहुतेक त्यांना असं वाटलं असावं, की आतापर्यंत शिकार कोणीतरी फस्त केली असणार किंवा असंही असू शकेल की आपल्या सिक्स-सेन्सने त्यांना कदाचित तिकडे जाण्यापासून अडवलं असेल, ज्याची त्यांना स्वतःलाही काही जाणीव नसेल.

दोन दिवस झाले. सगळं काही अगदी शांत व सरळमार्गी चाललं होतं. तिसऱ्या दिवशी वाघ आणि वाघीण परत सकाळी-सकाळी नदी-किनारी पोहोचले. पाहीलं तर काय, दोन गोल गरगरीत प्राणी ज्यांना जणू काही बहुतेक निसर्गानेच एकमेकांसाठीच बनवलं आहे, ते नेहमीप्रमाणे नदीत झपझप मासे पकडत होते. त्यांची एकरूपता पाहून वाघ व वाघीण दोघंही हसू लागले.

अस्वलाची नजर जेव्हा मोठ्या मांजरावर पडली तेव्हा तोसुद्धा हसला आणि हळूच अस्वलिनीला म्हणाला, "मित्र-परिवार आला आहे."

अस्वलिनीनेसुद्धा जेव्हा मागे वळून मित्रांकडे पाहिले तेव्हा तीही खळाळून हसली. दोघेही पाण्यातून बाहेर आले आणि नदीच्या काठावर येऊन बसले. आल्याबरोबर अस्वल वाघाला म्हणाले, "बरं झालं तुम्ही सगळे आलात." नंतर अस्वलिनीकडे काही अर्थपूर्ण नजरेने बघू लागला.

अस्वल पुढे काही बोलायच्या आतच वाघ अस्वलाच्या हावभावांकडे काही संशयित नजरेने बघू लागला आणि उतावळेपणाने त्याने विचारले, "सगळं ठीक आहे ना? तू अस्वलिनीकडे अशा नजरेने का बघतोस"?

"का, राजाच्या समोर कोणी आपल्या जोडीदारीणीकडे बारकाईने बघूसुद्धा शकत नाही का?" अस्वलाने हसत गोष्टीला बगल देवून वाघाचे लक्ष मुख्य विषयापासून वळविण्याचा प्रयत्न केला.

"मला माहीत आहे, नक्कीच काही तरी आहे!" वाघ चेहऱ्यावर एक गंभीर हास्य आणून म्हणाला. "परंतु तू मला काही सांगावं की नाही या द्विधा मनःस्थितीत आहेस!"

वाघीण एकदम स्तब्ध उभं राहून अस्वल आणि अस्वलिनीच्या चेहऱ्यावरील भाव-भावनांना वाचतं होती.

"आज दिवसासुद्धा मुलं तुमच्याबरोबर नाहीत!" अस्वलाने काहीसं आश्चर्यचकित होऊन विचारले आणि त्याचबरोबर विषयही बदलण्याचा प्रयत्न केला.

"झोपलेले होते, विचार केला झोपू द्यावं," वाघाने संक्षिप्त उत्तर दिलं परंतु त्यांच्या चेहऱ्यावरील पूर्वीसारखीच गंभीर उत्सुकता होती.

वाघ व वाघीण आपले दोन्ही पुढचे पाय पुढे पसरवून आरामात जमिनीवर बसले होते. अस्वलसुद्धा शांतपणे बसले होते.

अस्वलिनीकडे सर्वजण संशयात्मक नजरेने बघत असल्याचे जाणवताच काहीसे अस्वस्थ होऊन गळा साफ करत अस्वलाने विचारले, "दोन दिवसांपूर्वी तुम्ही तुमची अर्धवट खाल्लेली शिकार कायं तिथेच सोडून आलात?" आपली नजर वाघाच्या चेहऱ्यावर रोखून धरत अस्वलाने विचारले.

"हो, सोडून तर आलो होतो!" वाघाची नजर आश्चर्याने विस्फारली. "तुला कोणी सांगितले?"



"आज जेव्हा मी इकडे येत होतो तेव्हा प्राणप्रिय चित्ता भेटला होता." अस्वल पूर्वीसारखेच वाघाकडे रोखून बघत-बघत म्हणाला, "असं  म्हणत होता की, हे संपूर्ण क्षेत्र तुमचचं आहे. इकडे शिकार फक्त तुम्हीच करू शकता आणि ही अर्धवट सोडलेली शिकारसुद्धा अर्थातच तुमचीच असणार." असं म्हणतं-म्हणतच अस्वलाने आपली नजर खाली फिरवली आणि खाली बघत-बघतच म्हणाला, चित्ता म्हणत होता की, त्या रात्री त्यांच पोटसुद्धा भरलेलं होत म्हणून तो तुमच्या शिकारीला शिवलासुद्धा नाही." अस्वल पुढे असं काही बोलत होता की जसं काही खरं रहस्य आता उलगडणारच आहे. "तुला नाही माहीत, ती शिकार आज सकाळपर्यंत तशीच पडून होती." असं म्हणत अस्वल पुन्हा पराभूत होऊन वाघाकडे विस्फारलेल्या नजरेने बघू लागला.

वाघ आणि वाघिण निःशब्द होवून त्याच्या चेहऱ्याकडे बघू लागले. अस्वलिन त्यांच्या चेहऱ्याकडे काळजीने बघू लागली.

"मला तर असं वाटलं की आतापर्यंत जंगलातील सोकावलेल्या जीव-जंतुंनी आतापर्यंत शिकार फक्त केली असेल." वाघ गंभीर आवाजात हळूहळू बोलला. त्याच्या चेहऱ्यावर काळजीचे सावट दिसत होते. थोडं थांबून मग मोठ्या मुश्किलीने पुढे फक्त एवढंच म्हणू शकला, "आश्चर्य आहे."

"आश्चर्य काहीच नाही. फक्त थोडं समजून घेण्याची आवश्यकता आहे," वाघाला परिस्थितीमधील गांभीर्याची जाणीव करून देता-देता अस्वल म्हणाले.

काही वेळ व्याकूळ करणारी शांतता पसरली. नंतर ही शांतता भंग करत अस्वल म्हणाला, "जर तुम्हाला योग्य वाटतं असेल तर आपण सगळेच हळूच लपून जिथं तुम्ही शिकार सोडून आलात तिथं जाऊया." ही सर्व चर्चा चालू असतानाच तिथं चित्ता आला. तो वाघाला शोधत-शोधतच तिथं आला. सगळे जणं प्रश्नार्थक नजरेने त्याच्याकडे पाहू लागले, जसं काही तो नवीन बातमी घेवून आला आहे.

"इथं तर सगळेच लोक उपस्थित आहेत." चित्ता सगळ्यांकडे एक नजर टाकून हसत-हसत बोलला.

"आम्ही सगळे त्या अर्धवट खाऊन सोडलेल्या शिकारीकडे जाण्याविषयी बोलत होतो." अस्वल वाघाकडे संकेत करत चित्त्याला म्हणाला.

"बरोबर आहे! तिथं जाऊन प्रत्यक्षपणे आपण काहीतरी अनुमान लावू शकू." चित्त्याने या गोष्टीला लगेच मान्यता देत स्वीकार केला.

जेव्हा सर्व मित्रमंडळी धनदाट जंगलातून लपत-छपत शिकारीपर्यंत पोहोचले तोपर्यंत दुपार झाली होती. गिधाडांबरोबरच लहान-मोठी सगळी जनांवरं शिकारीवर तुटून पडली होती. जवळ-जवळ संपूर्ण शिकार संपल्यातच जमा झाली होती. फक्त त्या ठिकाणी त्या शिकारीच्या हाडांचा सापळाच शिल्लक राहिला होता आणि त्यासाठीसुद्धा ओढा-ओढी चालू होती. कोल्ह्याने तर शिकारीचा एक मोठा तुकडा घेऊन पळ काढला. तरसाने दादागिरी करून काही भागाचे लचके तोडले आणि जेव्हा ते घेऊन पळू लागले तेव्हा त्याच्यामागे काही गिधाडं लागली होती.



हे सर्व दृश्य पाहून सगळेजण आश्चर्यचकित होऊन एकमेकांकडे पाहू लागले. हळूच अस्वल म्हणाले, "आता बहुतेक सर्वांच्या लक्षात ही गोष्ट आली असेल."

"शिकारीवरचा पहारा आज सकाळनंतरच हटवला गेला आहे." चित्ता सगळ्यांना विश्वासात घेत म्हणाला, "मी जेव्हा सकाळी इथे आलो होतो, तेव्हा हे सगळे उष्ट्या शिकारीवर जगणारे शिकारीवर लांबूनच नेम धरून बसले होते."

"कदाचित शिकारीच मांस सडू लागलं असावं म्हणूनच सर्व पहारेकरी शिकारीला इथेच सोडून गेले असतील." अस्वलाने काहीशा चेष्टेने हसून म्हटले, "विचार केला असेल की वाघ आता खराब झालेले मासं खाण्यासाठी काही येणार नाही." असं म्हणत परत अस्वल एकदम गंभीर झाले आणि वाघाकडे तोंड करत मोठ्या आवाजात म्हणाले, "मृत्यूच्या दारात जाता-जाता वाचला आहात."

अस्वलिन आणि वाघीण मोठ-मोठ्या डोळ्यांनी वाघाला बघू लागल्या, जसं की तो असून नसल्यासारखा आहे. वाघीण हळूच तिथून निघून वाघाच्या बाजूला येऊन उभी राहिली. वाघाच्या जेव्हा ही गोष्ट लक्षात आली तेव्हा त्याला झोपेतून जागं झाल्यासारखं वाटलं. त्याने प्रेमाने वाघिणीकडे पाहिलं आणि हसला. स्वतःमध्ये विश्वास निर्माण करून ता म्हणाला, "घाबरू नका! या जंगलात असं अजून काही तरी शिल्लक आहे, ज्याने आम्हांला आणि तुम्हाला आजपर्यंत जिवंत ठेवलं आहे."

अस्वलिनीचे डोळे पाणावले होते. चित्तासुद्धा आपल्या शुष्क डोळ्यांनी वाघाला बघत होता. असं वाटत होतं की त्याला आपलं भविष्यसुद्धा डळमळीत दिसू लागलं होतं. अस्वलसुद्धा घाबरून तसेच स्वप्नं बघू लागले, जिथे गिघाडं एकमेकांवर तुटून पडले होते. त्याचवेळी वाघाला काहीतरी आठवले आणि तो अचानक जोरात ओरडला, "मुलं कंटाळून गेली असतील चल गुहेकडे जाऊया."

"आम्ही सगळेच तुमच्याकडे आलो तर?" व्याकूळ आणि चिंतित वाघ-दाम्पत्याला अशाप्रकारे एकटं सोडावसं अस्वलाला वाटत नव्हतं. तो सगळ्यांना बरोबर घेऊन वाघाबरोबर त्याच्या गुहेच्या दिशेने गेला.

सगळेजण जेव्हा गुहेकडे पोहोचले तेव्हा वाघाची मुलं बाहेरच खेळत होती. वाघ व वाघिणीला पाहून ते एकदम धावत जवळ आले व त्यांना बिलगले.

वाघ व वाघीण भावनाशील होऊन बराच वेळेपर्यंत मुलांना चाटत राहिले. अस्वल दाम्पत्य मंत्रमुग्ध होवून त्या प्रेमळ दृश्याकडे बघतच राहिले. परंतु चित्ता मात्र अजूनही सर्वसामान्य स्थितीत येऊ शकला नव्हता. तो तर फक्त शांत होता. त्याची रेखीव लांब मान खूपच सुंदर वाटत होती.

दुसऱ्या दिवशी जेव्हा वाघ आणि वाघीण दोघे जंगलात फिरायला निघाले तेव्हा त्यांची दोन मुलंही आज सोबत होती. वाघिणीने आपल्या मनात खदखदणारी आदल्या दिवशीची गोष्ट ओठांवर आणली आणि वाघाला हळूच विचारले, "असं होऊ शकत नव्हतं का की, गेल्या दोन दिवसांत जंगलातील या सोकावलेल्या जनांवरांची नजर आपल्या शिकारीवर पडली नसती?"

"वेड लागलयं का तुला?" वाघ एकदम उत्तेजित होऊन म्हणाला, "तू दोन दिवसांची गोष्ट करतेस इथं दोन ताससुद्धा शिकार या सोकावलेल्या जनांवरापासून वाचविणं कठीण आहे. नंतर वाघिणीकडे पाहून म्हणाला, "आणि त्यांची वास घेण्याची क्षमता बाप रे! बाप!! आणि हसून म्हणाला, "बऱ्याच दूर अंतरावर असणाऱ्या मांसाचा वाससुद्धा त्यांच्या नाकाच्या परिघातून सुटू शकत नाही." "आणि तोसुद्धा जेव्हा सडण्याच्या स्थितीत असेल तेव्हा!"

"मी तर फक्त एक अंदाज व्यक्त केला होता," वाघिणीने घाबरून हळूच दीर्घ श्वास घेत म्हटले.

"राणी! तू भोळी आहेस!" वाघसुद्धा एक गंभीर श्वास बाहेर टाकत म्हणाला, "तसंही माणसाचे षड्यंत्र आपल्या समजण्याच्या क्षमतेपलीकडचे आहे."

"काही-काही गोष्टी माझ्या ध्यानात येत आहेत," असं म्हणत वाघिणीने समोर खेळणाऱ्या आपल्या बछड्यांवर डोळेभरून एक नजर टाकली. नंतर वाघाकडे टक लावत म्हणाली, "माणसांनी दोन दिवस आपण येवू म्हणून दबा धरून त्या शिकारीची राखणं केली असेल आणि .....! बोलता-बोलता वाघीण अचानक थांबली आणि वाघाकडे बघू लागली. वाघही तिच्याकडे बघू लागला. दोघेही एकमेकांकडे गंभीर दृष्टीने थोडा वेळ बघत राहिले. मग वाघाने हळूच मध्येच सोडलेलं वाघिणीचे म्हणणे पूर्ण केलं. "..... आणि तिसऱ्या दिवशी जेव्हा मांस सडू

लागलं तेव्हा त्यांच्या अपेक्षांवर पाणी पडले असणार आणि त्यांच्या लक्षात आलं असणार की वाघ काही असं सडलेलं मांस खायला येणार नाही." असं म्हणत वाघ हसत उठला आणि दोघंही तिथून चालू लागले, "आणि शेवटी त्यांनी शिकार लहान-मोठ्या जनांवरांकडे सोपवून ते तिथून निघून गेले असणार."

वाघ-दाम्पत्य जेव्हा जंगलात फिरू लागले तेव्हा त्यांना सांभराचा शंख वाजविल्यासारखा आवाज ऐकू आला. परंतु त्या दोघा राजा-राणीने त्याकडे विशेष लक्ष दिले नाही. खरंतर त्यांना वाटलं की या इतक्या मोठ्या हरणाची शिकार करणं म्हणजे माणसाच्या चक्रव्यूहात घुसण्यासारखं आहे.

तरीसुद्धा वाघीण व्यंगात्मक हसत चेष्टेच्या सुरात म्हणाली, "चला या सांभराची आज पुन्हा शिकार करून कुठतरी लपवून ठेवूया आणि त्यांना पुन्हा दोन दिवस राखण करायला लावूया"

"आपण काही माणूस नाही आहोत, षडयंत्र करायला!" वाघाने अतिशय शांत स्वरात वाघिणीला समजावले.



त्या दिवसी एका छोट्या हरणाची शिकार केल्यामुळे वाघाचे कुटुंब संतुष्ट होऊन गुहेकडे परत आले, परंतु वाघ गुहेच्या दारापासून काही अतंरावर असतानाच काहीसा आखडून उभा राहिला आणि त्याने आपल्या सर्व परिवारालाही काही सांकेतिक खुणेने थांबायला सांगितले. त्याने वाघिणीला खुणेने जमिनीवर पडलेली झाडाची सुकलेली फांदी दाखविली जी मधोमध तुटलेल्या अवस्थेमध्ये होती. गुहेतून बाहेर पडताना त्याने अतिशय बारकाईने सर्वत्र चौफेर नजर टाकली होती तेव्हा ती फांदी तुटलेली नव्हती. नक्कीच कोणाचा तरी पाय पडल्यामुळे ती फांदी तुटली आहे. अर्थात तात्पर्य हे की त्याच्यापाठीमागे कोणीतरी या गुहेत आलं असावं. गुहेच्या दरवाज्याबाहेरील जमीन ही टणक असल्यामुळे त्यावर पायांचे ठसे ओळखणे तसे कठीणच होते.

वाघ कोणताही धोका पत्करू इच्छित नव्हता, म्हणून तो लगेचच आपल्या कुटुंबासमवेत नदीकडे निघून गेला. वाघाचे कुटुंब थोड्याच अंतरावर गेले असावे, तेवढ्यात वाघाला समोरून अस्वल आपल्या प्रिय सखीबरोबर जोडीने ठुमकत-ठुमकत येताना दिसले.

वाघाच्या कुटुंबाला थोडं काळजीत असल्याचे पाहून श्यामवर्णी मित्राने हसूनच विचारले, "काय झालं? त्या दिवशीच्या भीतीतून अजून बाहेर नाही आलात?"

"अरे नाही! काही नवीन घडलेलं आहे." असं म्हणत वाघाने पाहिलेल्या घटनेचा सर्व वृत्तांत मित्र दाम्पत्याला सांगितला. काळ्या युगलांची तर हसून-हसून पुरेवाट लागली. हसत-हसत गोल गरगरीत दाम्पत्य म्हणाले, "इतक का घाबरतायं! आम्ही दोघंचतर तुमच्या दरवाजावर प्रणाम करायला गेलो होतो." नंतर अस्वल काहीसं आठवून बोलला, "आणि त्या दिवशी माघारी फिरत असताना माझ्या पायाखाली सापडून एक झाडाची फांदीही तुटली." परत हसून म्हणाला, "आणि तेव्हा खरोखरचं मला माझ्या वजनाचा अभिमान वाटला!"

अस्वलाचे बोलणे ऐकून वाघ कुटुंबियांच्या चेहऱ्यावरील काळजीचे सावट दूर होऊन त्यांचे चेहरे एकदम प्रफुल्लित झाले.

"म्हणजे तुम्ही वाघाच्या घरी दरोडा घालण्यासाठी गेला होतात तर!" वाघाने हसत-हसत विचारले. "तुम्हाला मी आणखी एक गोष्ट सांगतो की, मी माझ्या गुहेत कधीच शिकार ठेवत नाही."

"जंगलातील असा कोणता मूर्ख प्राणी आहे जो राजाच्या घरावर दरोडा घालेल!" अस्वल हसत म्हणाले. "हा! चोरीची गोष्ट अजून वेगळी आहे, जी मला येत नाही!"

"चला जाऊद्या! आज तुम्ही माझी खूप मोठी चिंता दूर केलीत!" वाघ एकदम दीर्घ श्वास घेत म्हणाला, "यासाठी तुम्हाला धन्यवाद द्यावे लागतील का?"

"धन्यवाद तर माणसासाठी सोडा! तेच या वस्तूला खातात आणि शिजवतातसुद्धा!" अस्वलाने व्यंगात्मक टीका केली. नंतर वाघिणीकडे बघून हसून म्हणाला, "जंगलात तर शिकारच चालते! "होय की नाही राणीसाहेब?"

"ती तर मी तुला नक्की देणारच! हा माझा ठाम विश्वास आहे." वाघिणीने मोठ्या आत्मीयतेने व आग्रहाने अस्वल दाम्पत्याला आश्वासित केले. मित्राला भेटल्यानंतर वाघ निश्चित होऊन आपल्या गुहेत परत आला व अस्वल पती-पत्नीसुद्धा आपल्या गुहेकडे निघून गेले. अशाप्रकारे जंगलात एक दिवस हसत खेळत पार पडला.



दुसऱ्या दिवशी एक अद्भुत परंतु अतिशय चिंतित करणारी दुःखद घटना घडली! वाघ सकाळी पुन्हा आपल्या गाढ झोपलेल्या मुलांना गुहेत सोडून वाघिणीबरोबर धबधब्याकडे निघून गेला, परंतु दुरूनच तिथले दृश्य बघून ती पिवळी मांजरंसुद्धा शुद्ध हरपून बसली कारण बरीच माणसं धबधब्याजवळील नदीत जाळं टाकून मासे पकडत होते. ते तेथून थोडं पुढं आले आणि पाहतात तर काय अस्वल आणि अस्वलीन एका झाडापाठीमागे उभे राहून डोळे विस्फारून नदीवरील ते दृश्य बघत होते. वाघ-दाम्पत्यसुद्धा थोडे सरकून त्यांना खेटून उभे राहिले. सगळ्यांनी एकमेकांना आप-आपल्या शरीराने स्पर्श करून आपण जवळ असल्याचा आभास तर केला परंतु आपल्या निर्जीव डोळ्यांनी कुणीही एकमेकांकडे अजिबात पाहिले नाही.

त्या चारही वन्यप्राण्यांच्या भोवती एक निरव शांतता पसरली होती. नदी किनाऱ्यावर मात्र माणसांच्या आनंदाला उधाण आले होते. जेव्हा नदीच्या पाण्यातून माशांची नवीन खेप काढली जायची तेव्हा माणसांच्या हर्षोल्हासाने पूर्ण आसमंत दमदमून जात असे. त्याचवेळी अस्वलाच्या तोंडातून कन्हण्याचा आवाज येऊ लागला, "ही माणसं याच जाळ्यातून सगळं जंगलच का घेवून जात नाहीत!" तो पुन्हा पुटपुटला "म्हणजे डोळ्यांनी पाहणेही नको आणि पाहिल्याचे दुःखही नको!"

जड अंतःकरणाने व जड पावलांनी चारही जीव तेथून निघाले. थोडे अंतर दूर गेल्यावर वाघाने अस्वलाच्या डोळ्यांतून अश्रू वाहताना बघितले आणि एकदम थबकून वाघ थांबला. त्याने अस्वलाला



विचारले, "हे काय? तू रडतोस?" ते पाहून वाघिणसुद्धा पळत अस्वलाजवळ आली. त्याच्या तोंडाजवळ तोंड नेत ती त्याला समजावू लागली, "इतकं मनाला लावून घेऊ नका! आम्ही सर्वजण आहोत ना तुमच्यासोबत!"

आता अस्वलिनसुद्धा अस्वलाजवळ येऊन आपल्या अवघडलेल्या आवाजाने म्हणू लागली, "तुम्ही रडू लागला तर माझं कसं होणार? अस्वलीन अस्वलाच दु:ख पाहून स्वत:ला सांभाळू शकत नव्हती. म्हणून एकदम ती धपकन जमिनीवर बसली आणि विव्हळू लागली.

सर्व परिसर अस्वलासाठी असहाय झाला होता. अस्वल अस्वलिनीजवळ आला आणि आपल्या दोन्ही हातांनी त्याने तिचं डोकं आपल्या छातीजवळ लावलं. नंतर व्याकूळ होऊन म्हणाला, "मी उगाचच भावुक झालो होतो." तिचे अश्रू पुसत प्रेमाने म्हणाला, "तू रडू नकोस! कोणीच असं आपल्या पत्नीला रडताना पाहू शकणार नाही."

वाघ-दाम्पत्यसुद्धा अस्वलिनीजवळ येऊन बसले. वाघाने मोठ्या धाडसाने म्हटले, "जंगलात काय फक्त मासेच आहेत का खायला! अजूनसुद्धा खूप काही आहे."

अस्वलीन काहीशी सुस्त पडली होती. ती जमिनीवर डोकं ठेवून पूर्णपणे शिथिल होवून पडली होती. सर्वत्र भकास वाळवंट पसरल्यासारखे अस्वलाचे डोळे निस्तेज झाले होते. वाघाकडे तोंड फिरवून तो आपल्या जड आवाजात बोलला, "मी आज सांगतो की... हिच्या पोटात बाळं आहे." असं बोलता-बोलता त्याच्याही डोळ्यांतून पुन्हा अश्रू वाहू लागले आणि तो रडतच बोलला, "आम्ही जेव्हा इथं आलो तेव्हा तिला खूप भूक लागली होती." डोळ्यांची पापणी मिटायच्या आतच वाघ अति क्रोधित झाला. क्रोधित होवून नदीच्या किनारी जाऊन त्याने जोरात एक डरकाळी फोडली. जणू त्या डरकाळीतून त्याला सुचवायचे होते – "माझं जंगल लवकर खाली करा."

माणसांमध्ये भीतीने गाळण उडाली, जो तो जिथं असेल तिथून, आहे त्या अवस्थेत सोडून प्रत्येकजण आपला जीव मुठीत घेऊन सैरावैरा धावू लागले. एक दोघांकडे बंदूक होती. त्या बंदुकीतून त्यांनी इकडे-तिकडे फैरी झाडल्या व ते पळत सुटले.

ते चौघेजण जेव्हा नदीकिनारी पोहोचले तेव्हा सर्वत्र माशांचे ढिग पसरले होते. ते हळूहळू मासे खाऊ लागले. नंतर उठले आणि आप-आपल्या ठिकाणी पोहोचले.

निघताना वाघिणीने अस्वलिनीच्या जवळ जाऊन तिला प्रेमाने जवळ घेतले आणि तिला म्हणाली, "उद्या येऊ नकोस! आम्हीच तुझ्याजवळ शिकार घेऊन येतो."

वाघ आणि वाघिणीने रस्त्यातच दोन कोंबड्यांची शिकार केली. जी त्यांच्या मुलांसाठी भरपूर होती.

दुसऱ्या दिवशी अस्वलिन जास्तच सुस्त झाली होती. ती गुहेत अगदी मागील बाजूस भिंतीला लागून झोपली होती. अस्वल तिचं डोकं आपल्या मांडीत घेवून प्रेमाने थोपटत हात फिरवित होता. अस्वलाने हळूच तिच्या कानात विचारलं, "तुला भूक तर नाही लागली ना"? अस्वलिन डोळे उघडून हसली. अस्वलाच्या चेहऱ्याकडे पाहिले व नंतर मान हलवून सांगितले की अजिबात भूक लागली नाही. अस्वलिनीने पुन्हा कुशी बदलली आणि हळुच कुजबुजली, "खरंच तुम्ही माझ्यावर किती प्रेम करता हो!" असं म्हणता-म्हणता तिचे डोळे पुन्हा पाणावले.

अस्वल भावुक होऊन इकडे-तिकडे पाहू लागला. अस्वलिनीची अवस्था पाहून तो इतकं तर नक्की समजू शकत होता की आता ही कोणत्याही क्षणी प्रसव-वेदनेने तळमळू शकते आणि केव्हाही छोटी-छोटी बाळं या जगात येऊ शकतात.

अस्वल व्याकूळ होऊन स्वतःला लाचार समजत होता. तो विचार करत होता की, जर सकाळच्या प्रहरी अस्वलिनीला भूक जरी नाही लागली तरी थोड्या वेळाने नक्कीच तिला भूक लागणार. तेव्हा काय होईल! तो तिला अशा अवस्थेत एकटीला सोडून शिकारीच्या शोधात कुठेही जाऊ शकत नव्हता. त्याच क्षणी असे वाटत होते की अस्वलिनीने त्याच्या चेहऱ्यावरचे भाव वाचले असावेत. तिने त्याचा एक हात पकडून आपल्या डोक्यांवर ठेवला आणि हळूच दाबून जसे काही त्याला सूचित करीत होती की "का निष्कारण चिंता करताय? सर्व काही ठीक होईल!"

सकाळ सरून हळूहळू दुपारची वेळ आली. तेवढ्यात वाघ आणि वाघीण गुहेच्या दारात हजर झाले. त्यांनी एक मोठा शिंगवाला चितळं मारून आणला होता. सोबत दोन्ही मुलंदेखील होती.

वाघाने अस्वलाचा सेवाभाव पाहिला आणि हसून म्हणाला, "सहचारिणीवर कशा प्रकारे प्रेम केलं जातं हे मला तुझ्याकडूनच शिकले पाहिजे."

वाघ आणि वाघिणीला पाहून अस्वल पती-पत्नीचा चेहरा आनंदाने अगदी खुलला होता. अस्वलीन जेव्हा उठण्याचा प्रयत्न करू लागली तेव्हा अस्वलाने तिचे डोके हळूच खाली दाबले आणि म्हणाला, "तू नाही!" वाघ आणि वाघिणीनेसुद्धा तिला न उठण्यास सांगितले, परंतु तिने कोणाचेही ऐकले नाही. एका हाताच्या मदतीने ती हळूहळू उठून बसली. तिचं वाढलेल पोट जवळ-जवळ जमिनीला टेकत होतं.

अस्वल जेव्हा पुढे सरकून अस्वलिनीला मांडीत घेवून आपल्या शरीराचा आधार देण्याचा प्रयत्न करत होता, तेव्हा अस्वलिनीने त्याला नकार दिला आणि मी माझं आरामशीर बसू शकते असं म्हणाली. हे दृश्य पाहून वाघ भावनाशील होवून म्हणाला, "खरचं! तू आपल्या अस्वलिनीवर खूप प्रेम करतोस."



"अरे नाही! मी हिच्यासाठी काहीच करू शकत नाही!" नंतर डोळ्यांच्या कोपऱ्यातून वाहणाऱ्या अश्रूंना बोटांनी पुसत कंठ दाटलेल्या आवाजात अस्वल म्हणाले, "हिने मला इतकं काही दिलं आहे की क्वचितच कुणी....." असं म्हणताना शब्द त्याच्या घशातच अडकू लागले.

"अरे हा आनंदाचा क्षण आहे. तान्ही बाळं या पृथ्वीवर जन्माला येणार आहेत." वाघीण आनंदित होऊन म्हणाली, "आता दुःखद गोष्टी बंद केल्या पाहिजेत." पुन्हा वाघाकडे बघून हसून म्हणाली, "शिकारीला ओढून गुहेच्या आत सगळ्यांच्या जवळ घेवून या. सर्वजण आतच मेजवाणी करतील."

अस्वलिन आपलं वाढलेल पोट संभाळत हळूहळू सगळ्यांच्या जवळ येऊन बसली.

दुपारी खूप आनंदाने मेजवाणी झाली. सिंहाचे दोन्ही बछडे खूप मजा घेऊन घेऊन शिकार खात होते. पोट भरल्यावर ते गुहेच्याबाहेर जाऊन खेळायला लागले.

गुहेमध्ये आता मेजवाणीनंतरच्या गोड गोष्टींची चर्चा सुरू झाली. एक-एक करून सर्वजण आपल्या आयुष्यातील कडू-गोड अनुभव सांगू लागले. विशेषतः असे अनुभव की ज्यामुळे जे ऐकून-ऐकून पोटात पिळ बसेल.



अस्वल सांगू लागला की कसे एका अंधाऱ्या रात्री तो मधमाश्यांचे पोळं बघून झाडावर चढला. परंतु तेथे जाऊन पाहिले तर एक माणूस काळी घोगंडी पांघरून तेथे बसला होता.

वाघदेखील काहीतरी सांगणार तेवढ्यात अस्वलिनीला हळूहळू पोटात प्रसव-वेदना सुरू झाल्या. बघता-बघता त्या एवढ्या वाढल्या की ती व्याकूळ होवू लागली. वाघ बाहेर येऊन मुलांजवळ येऊन बसला. अस्वलदेखील घाबरून बाहेर येऊन वाघाकडे असं बघू लागला की जणू काही त्याला अत्ताच रडू येईल आणि जसं काही विचारतोय आता मी काय करू?

वाघीण आतमध्ये गुहेत अस्वलिनीच डोकं थोपटून थोपटून तिला धीर देत होती. "आई व्हायचे सुख मिळविण्यासाठी तुला या वेदना सहन कराव्याच लागतील." नंतर अस्वलिनीच्या तोंडाजवळ आपले तोंड नेऊन हसून म्हणाली, "तुझ्या पोटी प्रकृतीची नवी मुलं जन्माला येतं आहेत! तू खूप भाग्यशाली आहेस.

तेवढ्यात वाघ आणि अस्वलाने गुहेतून दोन छोट्या अस्वल बालकांचा कू-कू असा आवाज ऐकला. तो ऐकून अस्वल आनंदाने जोर-जोरात रडू लागला. तो दोन्ही हातांनी वाघाला पकडून बिलगला. त्याचा आनंद बघून वाघदेखील खूपच भावुक झाला. त्यालाही वाटले की आता आपल्याही डोळ्यांतून लगेच अश्रू तरळू लागतील.



अस्वलिन आपल्या दोन्ही बाळांना कुशीत घेवून मंत्रमुग्ध होवून एकटक बघत होती. एक क्षणसुद्धा ती आपली नजर त्यांच्यावरून हटवू शकत नव्हती. केव्हा केव्हा तर भावनाशील होवून त्यांचा पापा घेत होती.

वाघीण बाहेर येऊन वाघाला म्हणाली, "चला आपण निघूया. आता हे एकटे आपलं कुटुंब संभाळू शकतील!" नंतर हसून म्हणाली, "आणि आपल्या अस्वलिनीवर प्रेम करा." नंतर चेष्टेने मोठे-मोठे डोळे करत म्हणाली, "शेवटी हिने याला दोन मुलांचा बाप बनविलेच!"



दुसऱ्या दिवशी जेव्हा वाघाचे कुटुंब शिकार घेवून परत अस्वलाच्या गुहेजवळ आले तेव्हा सूर्य डोक्यावरून पुढे सरकला होता. अस्वलिन आपल्या दोन्ही मुलांना छातीशी कवटाळून गुहेच्या मागील बाजूच्या भिंतीशी खेटून गाढ झोपली होती. त्याचवेळी अस्वल दाराजवळ झोपून उन्हाचा आनंद घेत होता आणि त्याचवेळी बहुतेक पहारासुद्धा करत होता, परंतु त्याने दोन्ही हातांनी आपले डोळेसुद्धा झाकले होते. कदाचित प्रखर सूर्यप्रकाशापासून डोळ्यांचे संरक्षण करण्यासाठी. त्याचवेळी त्याला बाहेर खड-खड असा आवाज ऐकू आला आणि तो एकदम उठून उभा राहिला आणि एकदम सावध होवून त्याने इकडे-तिकडे पाहिले तर त्याच्या लक्षात आले की, वाघाचे कुटुंब तोडांत शिकार धरून फरफटत आणत आहे. त्यांची मुलंसुद्धा त्यांच्या मागेपुढे हसत खेळत मजा करत-करत येत आहेत.

वाघाने जेव्हा दारातूनच आतमध्ये अस्वलिनीला झोपलेलं पाहिलं तेव्हा हळूच अस्वलाला म्हणाला, "आपण सगळे बाहेरच बसूया. त्यांना आरामशीर आत झोपू देत."

वाघिणीने जेव्हा आत अस्वलिन आणि तिच्या मुलांना एकमेकांना बिलगून झोपलेलं पाहिलं तेव्हा तिचं प्रेमही उफाळून आलं आणि ती स्वतःला थांबवू शकली नाही. ती हळूच पावलांनी आत जाऊन त्यांच्या जवळ बसली. जेव्हा तिचं मातृत्व अधिक उफाळून आलं तेव्हा ती दोन्ही मुलांना हळूच चाटू लागली. दोन्ही मुलं अधिकच कानकोंडे होऊन आपल्या आईला आणखीनच चिटकून झोपली. अस्वलिनीने झोपल्या-झोपल्याच उताणं होवून मुलांना छातीजवळ ओढून घेतलं आणि थापटायला लागली. हे सर्व दृश्य पाहून वाघिणीच्या डोळ्यांत प्रेमाश्रू आले. ती हळूच उठली आणि काहीही आवाज न करता बाहेर निघून गेली.

"खूप गोड मुलं आहेत!" वाघीण आपल्या चमकदार डोळ्यांनी वाघाला म्हणाली.

"सकाळपासून आईला काही दिलं की नाही?" वाघाने आपल्या दबक्या आवाजात अस्वलाला विचारले.

"इथेच थोडं दूर एक मोठ मधाचं पोळं लागलं होत." अस्वल आपल्या संतुष्ट व आनंदी चेहऱ्याने वाघ आणि वाघिणीला म्हणाला, "खूप दिवसांपासून ते या दिवसासाठी राखून ठेवले होते. आज सकाळी आणून तिला खूप सारं मध खायला दिलं." नंतर हसून म्हणाला, "आईने मुलांनासुद्धा चाटवलं!"

हे सर्व ऐकून वाघीण हसू लागली आणि म्हणाली, तू जेवढा चांगला एक प्रेमी आहेस तेवढांच एक चांगला पितादेखील बनशील!" नंतर काही क्षणातच विश्वासपूर्ण शैलीत तो म्हणाला, "मला माहीत आहे.

वाघ वाघिणीकडे चेहरा फिरवत म्हणाला, "माझीसुद्धा थोडी प्रशंसा कर." "शेवटी मीसुद्धा आपल्या या सुवर्णसुंदरीसाठी व तिच्या मुलांसाठी काहीतरी करतोच की!"

"तू रागीटसुद्धा आहेस!" असं म्हणत वाघिणीने एक सुंदर स्मितहास्य केलं. नंतर आपलं तोंड वाघाच्या कानाजवळ नेऊन हळूच बोलली, "खरंच सांगू का, तू इतका मधुर आणि भावनाशील प्रेमी होऊच शकत नाहीस!"

"पिवळ्या मांजरांमध्ये ही काय कुजबुज चालली आहे?" अस्वल काहीशा तक्रारीच्या स्वरात म्हणाले, "आमच्यापासून काही गोष्टी लपवाव्या लागतील एवढं आम्हालां परकं नका समजू!"

"ही माझ्या कानातसुद्धा तुझचं कौतुक करत होती!" वाघ मनमोकळेपणानं हसत म्हणाला, "मी तुझ्यासारखा प्रेमी बनू शकत नाही, असं ती म्हणते!"

"जर वाघ प्रेमी बनू लागला तर जंगलाची सगळी शिस्तच बिघडून जाईल." अस्वल बोलण्याला वेगळं वळण देत हसून म्हणाला, "आता हा काळा प्राणीसुद्धा एकवेळ प्रेमी बनू शकतो पण वाघ नाही!" असं म्हणत अस्वल जोरात हसू लागला.

एवढ्यातच अस्वलिन झोपेतून उठली होती आणि पडल्या-पडल्याच आपल्या बाळांना दूध पाजत होती. वाघीणसुद्धा तिच्याजवळ जाऊन बसली आणि त्या लहानग्यांच्या ओठांवर हात फिरवत तिच्या डोळ्यांत बघून म्हणू लागली, "तुझा जोडीदार तुझ्यावर इतकं प्रेम करतो, तू हे प्रेम कसं पेलतेस?"

अस्वलिनीने जेव्हा वाघिणीच्या डोळ्यांत खोलवर पाहिले तेव्हा तिला आपलेच डोळे पाणावलेले दिसले आणि मग दाटलेल्या कंठानेच एकदम हळू आवाजातच ती म्हणाली, "या जीवनात माझ्याकडे

फक्त एवढंच आहे!" नंतर वाघिणीला रडवलेल्या आवाजातच विचारले, "तूचं सांग मग मी धन्य नाही का ?"

त्याचवेळी अस्वल गुहेच्या एका कोपऱ्यात राखून ठेवलेल्या मधाच्या पोळ्याचा एक तुकडा घेऊन आला आणि अस्वलिनीच्या पुढे करत म्हणाला, "घे आता हे खा."

"नाही, आता तुला हे खावं लागेल!" अस्वलिन आपला राग दाखवत काहीशी प्रेमळ तक्रार करत म्हणाली, "सकाळपासून उपवासचं केला आहे. फक्त माझीच काळजी असते!"

"तुला समजत कसं नाही, मला थोडच मुलांना दूध पाजायचं आहे!" अस्वल जोरात हसून म्हणाला. नंतर वाघिणीकडे पाहून म्हणाला, "जंगलाची राणी! तुम्हीच हिला समजावू शकता!"

"मध हे काही खराब होणारी गोष्ट नाही!" वाघिणीने काहीशा मध्यस्थीच्या भूमिकेने अस्वलाला सांगितले, "हे नंतर खाण्यासाठी ठेवा. यावेळी शिकार आली आहे तर सगळे मिळून हेच खाऊया!"

शिकारीचं नरम मास मुलं आणि अस्वलिनीला दिलं आणि बाकी शिकार तर प्राणी किटक खाऊ लागले. अस्वल शिकार खाता-खाता म्हणाले, "जंगलाच्या राजाशी मैत्री झाली तर फायदेच फायदे आहेत!"

"असा चुकीचा विचार नको करू!" वाघ काहीसा हसून म्हणाला, "राजावर हल्ला करण्यासाठी खूप जण टपून बसलेले असतात, त्याच चक्रात त्याचे मित्रसुद्धा येऊ शकतात!"

"आता अशा आनंदाच्या प्रसंगी उदास गोष्टी नको!" अस्वल पटकन काहीसं क्रोधित होऊन म्हणाला, काही क्षणासाठी तो शांत राहीला. नंतर स्वतःच काहीसा चिंतीत होऊन म्हणू लागला. "माहीत नाही या माणसांचे आम्हां प्राण्यांबरोबर काय वैर आहे?"

हे ऐकून वाघीणसुद्धा काहीशी विचलित झाली. हताश होऊन म्हणाली, "आम्हांला तर दिवसरात्र मुलांचीच काळजी वाटते." नंतर अस्वलिनीकडे तोंड फिरवून म्हणाली, "जर आपण नाही राहिलो तर मुलांच कसं होणार?"

सगळ्यांच्या गप्पा ऐकून अस्वलिन त्रस्त झाली खरी, पण मोठ्या तटस्थपणे तिने चर्चेला नवे वळण दिले आणि म्हणाली, "कालपासून हवामान एकदम थंड झाले आहे आणि ढगसुद्धा भरून

आले आहेत." पुन्हा लांब डोंगरावर नजर फिरवत म्हणाली, "असं वाटतं तिकडे पाऊस पडला आहे किंवा बर्फ पडला आहे!"

"हो! इथेसुद्धा पाऊस पडण्याची काही लक्षणं दिसू लागली आहेत!" वाघाने आकाशाकडे मान करून ढगांकडे बघत अस्वलिनीच्या बोलण्याचे समर्थन केले. नंतर अस्वलिनीला सावध करत म्हणाला, "तू या नवीन जीवांकडे लक्ष दे, त्यांच्यासाठी ही पहिलीच थंडी आहे!"

संध्याकाळ होऊ लागली होती. वाघाने परत वर पाहिले. आकाशात आता खरोखरंच ढगांचा गडगडाट सुरू झाला होता. "आता आपली बैठक संपली पाहिजे. आपली निघण्याची वेळ झाली आहे!"

अस्वलीनं पूर्ण मातृत्व भावनेने म्हणाली, "मुलं बरोबर आहेत, लवकर निघालात तर बरं होईल!" मुलांकडं पाहून पुन्हा म्हणाली, "या कडाक्याच्या थंडीत भिजणं ठीक नाही!"

वाघाने अस्वलाला विचारले, "उद्याचा काय कार्यक्रम आहे"?

"तुम्ही सगळे त्रास करून नका घेऊ." अस्वलाने वाघ आणि वाघिणीला समजाविले. "ही उद्या बाहेर जाईल आणि काही फळं व फुलं खाऊन येईल." नंतर हसून म्हणाला, "उद्या हे जाडे वडील आपल्या मुलांना संभाळतील."

"आणि जर मुलं भुकेने रडू लागली तर हे वडील काय करतील?" वाघिणीने काहीसं उपरोधाने हास्य करीत विचारले.

"जसं काय मुलांना संभाळण्याचं काम फक्त आईच करू शकते. मी त्यांना मध चाटविन!" अस्वल मोठ्या मजेने म्हणाला. नंतर वाघिणीला आठवण करत म्हणाला, "विसरलीस का? तूच तर दुपारी मध ठेवलं होतसं ना!"

याचवेळी वाघाची मुलं आपल्या आईला बिलगून तिच्या कानात कुजबुज करू लागली होती. त्यांना आता आपल्या घराची आठवण येऊ लागली होती.

वाघिणीने आपल्या पूर्ण शरीराला ताण देत उत्साहित केलं नंतर उभं राहून वाघाकडे बघून म्हणाली, "राजे! आता तुम्हीसुद्धा चला!"

वाघ उठत-उठत अस्वलाला म्हणाला, "तू संकोच नको करूस. जर तू म्हणालास तर मी उद्या पुन्हा शिकार घेऊन येईन."

"अरे नको-नको! आपल्या उपकाराच्या ओझ्याने मला इतकं वाकवू नका!" अस्वल म्हणाले, "तुम्ही तर आपलेच आहात. जर तशीच गरज पडली तर पळत-पळत येईन."

वाघाचे कुटुंब गेल्यानंतर अस्वल-दाम्पत्य आपल्या गुहेत आले आणि नवीन दूधपित्या पाहुण्यांना कुरवाळू लागले.



काही दिवसांनी वाघ आणि वाघिण झऱ्याच्या ठिकाणी आले. त्याचवेळी अपेक्षा होती त्याप्रमाणे फक्त अस्वलच पाण्यात जाऊन मासे पकडून फस्त करत असल्याचे दिसले. जेव्हा अस्वलाची नजर नदीकाठी उभे असलेल्या वाघ-दाम्पत्यकडे गेली तेव्हा तो पाण्यातून बाहेर येऊन त्यांच्याजवळ आला.

अस्वल जवळ येताच वाघाने हसून विचारले, "तुमची मुलं कशी आहेत?" त्याने 'मुलं' शब्दावर विशेष भर दिला. जसं की त्याला म्हणायचं होतं की तुम्हीसुद्धा मुल-बाळावाले झाला आहात.



"सगळं ठीक आहे, फक्त....!" असं बोलता-बोलता जेव्हा अस्वलमहोदय एकदम उदास होवून चुप झाले तेव्हा वाघ आणि वाघीण दोघंही चकित झाले आणि विचारू लागले, "काय झालं? एकदम का थांबला?"

एक दीर्घ श्वास घेवून काळाजीव म्हणाला, "हेच की अस्वलिनीशिवाय कुठेच यावं-जावं वाटत नाही!" काहीसं आणखी दुःखी व उदास होऊन तो म्हणू लागला, "तिच्याशिवाय तर हा झरा (नदी) सुद्धा मला खायला उठतो." असं म्हणत अस्वल काहीसा हरवल्यासारखा झाला आणि दुसरीकडे बघू लागला.

वाघिणीने एकदम एक अर्थपूर्ण नजरेने वाघाच्या डोळ्यांत पाहिले जसं की ती आठवण करून देत होती की, "मी म्हणतं होते ना, याच्यापेक्षा चांगला प्रेमी मिळणं कठीण आहे."



“चला काही दिवसांचाच तर प्रश्न आहे!” वाघ मोठ्या आपुलकीने समजावत बोलला, “उदास का होतोस! हे सगळं तू तिच्या आणि मुलांच्या हितासाठीच करत आहेस ना.”

“तू म्हणलास तर तुझ्या गैरहजेरीत मी तिच्या जवळ बसत जाऊ का?” वाघिणीने अतिशय भावनाशील होत विचारले, “आमच्या दोघींचे मन रमेल आणि तिचा एकटेपणाही दूर होईल.”

“आता ती एकटी कुठे आहे?” अस्वलाचा चेहरा एकदम आनंदित झाला. प्रसन्न होऊन तो म्हणाला, “दिवस-रात्र फक्त आपल्या मुलांमध्येच मग्न असते. मला तर ती पूर्ण विसरूनच गेली आहे!”

“मग आता काय तू मासे पकडून घेवून जाणार का? आणि किती मासे घेवून जाऊ शकशिल?” वाघाने आश्चर्याने विचारले, वाघीणसुद्धा अस्वलाचे उत्तर ऐकण्यासाठी त्याच्या तोंडाकडे पाहू लागली.

“अरे असं कुठं शक्य आहे?” अस्वल वाघ आणि वाघीण दोघांकडे बघून म्हणू लागला, “मी काल सांगितलं होत ना जेव्हा मी मुलांना संभाळू लागेल तेव्हा ती बाहेर निघेल.” नंतर पुन्हा हसून म्हणाला, “आणि जेव्हा ती मुलांना सांभाळेल तेव्हा मी इथे माशांच्या मागे धावतांना तुम्हाला मिळेल.”

वाघ अस्वलाचे म्हणणे ऐकून हसला आणि म्हणाला, “खूप चांगली व्यवस्था तयार केली आहे.”

“विसरलास तू, हे सगळं तर तूसुद्धा करत होतास.” वाघिणीने हसून वाघाला आपल्या मागील दिवसांची आठवण करून दिली.

“तरीसुद्धा तू म्हणतेस की, मी तुझी कधीही सेवा केली नाही!” वाघाने आपल्या प्रियेला प्रत्युत्तर दिले.

“करत तर होता की सगळं!” वाघिणीने वाघाकडे मान वर करून मोठ्या नजरेने बघितले आणि म्हणाली, “आजसुद्धा करता! फक्त थोडं कमी ओरडा.”

"तू म्हणालीस तर मी तोंडसुद्धा उघडणार नाही!" वाघाने चेष्टा केली की तो उपरोधाने बोलला हे कळले नाही.

"असं करशील तर गिधाडंसुद्धा तुझी शेपटी ओढून नेतील!" वाघीण जोरात, खळखळून हसली.

"आता हा वादविवाद बंद करा," अस्वल मध्येच एकदम ओरडले. "आता चला निघूया, माझ्या श्यामलीची खबरबात घेऊया."

जेव्हा अस्वल वाघ-दाम्पत्याबरोबर आपल्या गुहेत आले तेव्हा त्याने पाहिले की, आईने एका मुलाला आपल्या पोटाशी कवटाळून झोपवले होते आणि दुसऱ्याला दोन्ही हातांनी हवेत उडवत-उडवत आईच्या वात्सल्यभावनेचा आनंद घेत होती. हे पाहून वाघीण जोरात हसली, "मी तर ना असं बसू शकते आणि ना अशाप्रकारे मुलांशी खेळू शकते."

अस्वलानेसुद्धा हसत-हसत उत्तर दिले. "हे सुख सगळ्यांनाच मिळत नाही." नंतर तो वाघिणीकडे बघत म्हणाला, "यासाठी तुम्हाला आपला गोरा रंग काळा करावा लागेल."

"जंगलाच्या राणीचा पिवळा रंग काळा करू नका." वाघसुद्धा या हास्य-विनोदात सहभागी झाला. "आमच्याकडे जे आहे त्यात आम्ही खूप आनंदी आहोत."

यावर अस्वलाने लगेच आपले डोळे विस्फारून विचारले, "आम्ही काळे लोक काय वाईट आहोत?"

"तुम्ही तर सर्वांत जास्त प्रेमळ आहात!" वाघ अतिशय नम्रतेने समजावत बोलला, परंतु तुम्हाला जर कोणी पिवळं बनवलं तर बहुतेक इतके सुंदर दिसणार नाही."

"खूप समजूतदारपणे बोलू लागला आहेस!" अस्वल थोडा आश्चर्याने बोलला, नंतर वाघिणीला विचारले, "वाघाला अशा प्रकारची शिकवण तू दिलीस का?"

"काहीसा संगतीचा प्रभाव पडतोच की!" असं म्हणत वाघीण जोरात हसली.

अस्वलिनीने आपल्या दोन्ही मुलांना जवळच जमिनीवर झोपवलं होतं आणि आता ती कीं-कीं करून ओरडू लागली होती. नंतर वाघिणीकडे पाहत तक्रारीच्या स्वरात म्हणाली, "मला तर वाटलं की तुम्ही सगळे मला विसरलात."

"तू अगदी योग्य विचार केला आहेस." अस्वल वाघ-दाम्पत्यांकडे संकेत करत म्हणाला, "आजसुद्धा यांना पकडून मीच घेऊन आलो आहे."

"मग तर मी या सोनेरी केसांच्या माणसांशी बोलणारचं नाही!" असं म्हणत अस्वलिनीने नाराजीच नाटक केलं आणि आपल्या एका बाळाला पुन्हा उचलून जवळ घेतलं.

"तू नको बोलू माझ्याशी!" वाघीण जमिनीवर झोपलेल्या बाळाच्या जवळ जाऊन बसली आणि म्हणाली, "मी तर या बाळाशी खेळायला आले आहे."

काही वेळ अस्वलाच्या मुलांशी खेळल्यावर व प्रेमाने कुरवाळल्यानंतर वाघ आणि वाघीण तिथून जायला निघाले. ते सकाळीच आपल्या मुलांना सोडून आले होते आणि आता त्यांना आपल्या मुलांची काळजी वाटू लागली होती. आता जवळ-जवळ दुपार होऊ लागली होती.

अस्वलाने वाघ कुटुंबियाची जाण्याची उत्सुकता पाहून तक्रार केली, "हे काही बरोबर नाही! आत्ताच आलात आणि लगेच निघण्याची तयारी करताय!" अस्वलाच्या बोलण्यात खूपच आपलेपणा बरोबरच निःस्वार्थ प्रेमाची भावनाही दिसत होती.

"काय करणार! मुलांना सोडून आलो आहोत ना?" वाघ काहीसं काळजीनं बोलला, खरं तर त्याची जाण्याची अजिबात इच्छा नव्हती पण नाईलाजाने जावं लागतं होतं.

"हे बघा, मी तुम्हा दोघांना एक गोष्ट सांगते" असं म्हणत अस्वलिनीने वाघ-दाम्पत्याकडे खूप गंभीरपणे पाहिलं. "तुम्हा दोघांचं अशा प्रकारे मुलांना एकटं सोडून सारखं-सारखं येणं अजिबात योग्य नाही." मग ती एकदम भयभीत डोळ्यांनी काहीसं सावध करत म्हणाली, "कदाचित आयुष्यभरासाठी पश्चाताप करण्याची वेळ येईल."

अस्वलिनीचं म्हणनं ऐकून सगळ्यांच्या हृदयात भीती आणि संशयाने धडधड होऊ लागली. काही क्षणांसाठी भयानक शांतता पसरली होती. काही वेळाने अस्वलाने आपला घसा साफ करत कठीण व पहाडी आवाजाने त्या उदास शांततेचा भंग केला. वाघाकडे एक गंभीर नजर टाकत अस्वल म्हणाले, "ही बरोबर म्हणते आहे. जंगलात माणसांची वर्दळ किती वाढली आहे."

हे सगळं ऐकूण वाघीण विचलित झाली. तिचं मन नाना शंकानी भरून आलं. ती घाबरलेल्या कापऱ्या आवाजात वाघाला म्हणाली, "चला निघूया, आता एक क्षणसुद्धा नको थांबायला."

चालता-चालता वाघ व्याकूळ होवून अस्वलाकडे बघून म्हणाला, "आपण आपल्या गुहेत सुरक्षित आहोत की बाहेर जंगलात हेच समजत नाही!" वाघाने अस्वलिनीकडे भेदरलेल्या नजरेनं पाहिलं आणि म्हणाला, "मुलं जेव्हा गुहेत एकटी असतात तेव्हा आपल्या पश्चात काही घडलं तर याची भीती वाटत असते आणि जेव्हा बरोबर असतात तेव्हासुद्धा भीती वाटते. जर आपण कधी संकटात अडकलो तर मुलं स्वतःला कसं वाचवतील!"

"आता स्वतःला इतकं काळजीत नको टाकू," अस्वलाने वाघाला समजावले. "जेव्हा असं काही होईल तेव्हा पाहू, आता शांतपणे गुहेकडे जा."



प्रत्येक ऋतूमध्ये फूलं ही बहरत नाहीत आणि प्रत्येक दिवशी झाडाची पानंही गळत नाही. ही गोष्ट प्राण्यांच्या आयुष्यात जेवढी खरी आहे, तेवढीच मनुष्याच्याही जीवनातही; परंतु प्राणी हे सहजगत्या समजू शकत नाहीत. भूतकाळातील घटनांच्या निष्कर्षावरून ना वर्तमानाचा अंदाज घेवू शकतात ना वर्तमानातील गुणाकार व भागाकाराने भविष्यातील अंदाजाचा अनुमान लाऊ शकतात.

दुसरी गोष्ट, जंगलात नित्य घडणाऱ्या स्वाभाविक गोष्टी जंगलातील प्राण्यांचे एवढं लक्ष आकर्षित करत नाहीत, परंतु जर एखादी बारीकशी जरी अस्वाभाविक घटना घडली किंवा काही बदल झाला व काही अपरिचित घडले तर सर्वांचे लक्ष आकर्षित होते.

त्या दिवशी दुपारी अस्वलाकडून वाघ आणि वाघीण काहीसे घाबरलेल्या अवस्थेतच जेव्हा आपल्या गुहेकडे परत आले तेव्हा एक दुसरंच आश्चर्य समोर आ वासून उभं होतं.

गुहेच्या जवळ आल्यावर वाघ-दाम्पत्य नेहमी प्रमाणेच काही अंतरावर उभं राहूनच आजू-बाजूचं निरीक्षण करू लागले. तेवढ्यात वाघाने पाहिले की कशाच्या तरी वजनाने दबलेले गवत पुन्हा पूर्ववत होत होते. वाघाचे हृदय संशयाने भरून गेले. त्याने हळूच वाघिणीकडे वळून पाहिले. वाघिणीच्या सावध नजरेनेसुद्धा दबलेले गवत पूर्ववत होताना पाहिले होते आणि तीसुद्धा धाबरून चहूकडे पाहू लागली. वातावरणात पूर्ण शांतता होती. हवासुद्धा हलत नव्हती. स्पष्टपणे दिसतं होतं की आत्ताच कोणीतरी तिथून गेलं आहे आणि त्याच्या पायाने दबलेले गवत नंतर पुन्हा पूर्ववत झाले आहे.

वाघाने आपल्या नजरेच्या खुणेनेच वाघिणीला आपल्या जागीचं उभं राहायला सांगितलं. नंतर एकदम मुंगीच्या चालीने पावलं उचलत तो पुढं जाऊ लागला. आता गुहेच्या आतमध्ये

मान उंच करून तो बघू शकत होता. वाघानं पाहिलं तर मुलं एकदम बेसावधपणे झोपलेली होती. त्याने एकदम सुटकेचा श्वास घेतला आणि मान हलवून वाघिणीला मुलं सुरक्षित असल्याचा इशारा केला.

वाघ अगदी थोडाच पुढे सरकला आणि पाहतो तर काय पहिल्यापेक्षा ही भयंकर दुसरं आश्चर्य समोर उभं होतं. एक हिरव्या पानांची तुटलेली फांदी समोर पडलेली होती. हे दृश्य पाहून वाघ एवढा घाबरला की उभचं राहू शकला नाही आणि तिथचं जमिनीवर गुपचूप बसला. वाघिणीने वाघाला अशाप्रकारे जमिनीवर बसलेलं पाहिलं आणि काही क्षणांत सर्व काही ठीक दिसतं नाही याचा अंदाज लावला. तीसुद्धा सरकत सरकत वाघाच्या शेजारी जाऊन बसली. वाघाने जेव्हा तिला झाडाची हिरवी फांदी दाखविली तेव्हा तिचे डोळेसुद्धा घाबरून मोठे झाले. आता



तर हे नक्कीच होतं की, थोड्या वेळापूर्वी तिथं कोणीही आलेलं नाही असं होवूच शकत नव्हतं. जंगलात कोणताही प्राणी अशाप्रकारे हिरवीगार फांदी तोडून फेकत नाही. तिथं दूर-दूरवरसुद्धा माकडं दिसत नव्हती. निदान त्यांच्या उड्या मारण्याने तरी झाडाची फांदी तुटली असेल तर असंही काही नव्हतं.

हे सगळं वातावरणातील दृश्य आपल्याला जागरूक करत आहे, हे वाघ-दाम्पत्याने गंभीरपणे ओळखले होते. काही वेळ सगळीकडे हृदयस्पर्शी शांतता पसरली होती. वाघ व वाघीण तसेच दम धरून मूर्तिवत भावनेने तिथे बसून वाट पाहत राहिले अशासाठी की, कुठेतरी काहीतरी हालचाल झाली तर त्यांचे टवकारलेले कान ते ऐकू शकतील किंवा पाहू शकतील; परंतु जेव्हा कुठूनही काहीच प्रतिसाद न मिळाल्याने ते दोघेही रागाने तावातावाने उठले. याचा अर्थ स्पष्ट होता की अजूनही वेळ गेली नाही. जे कोणी असेल तिथं असेल त्यांनी समोर यावं परंतु जेव्हा काहीच हालचाल दिसेना तेव्हा दोघेही हळूच पावलांनी गुहेत पोहोचले. मुलांना उठवून त्यांनी हृदयाशी कवटाळले आणि बराच वेळ चाटत राहिले.

काही वेळाने वाघ अतिशय खेदाने वाघिणीकडे बघत म्हणाला, "आता आपल्याला ही गुहा सोडायला पाहिजे."

वाघिणीने मान वळवून गुहेच्या छताकडे व भिंतीकडे नजर फिरविली तेव्हा तिचे डोळे भरून आले. त्यांच्या बऱ्याच आठवणी या गुहेशी जोडलेल्या होत्या. इथेच त्यांच्या प्रेममयी रात्री गेल्या होत्या. कितीतरी सोनेरी स्वप्नांना याच छताखाली विणले होते. याच ठिकाणी ती गर्भवती होवून इथेच तिने प्रसव-वेदना सहन करून एक दिवशी आई बनली होती. आज संसार सोडून जावं लागणार! कुठे? नाहीत नाही!

वाघाने जेव्हा वाघिणीच्या भावना जाणल्या तेव्हा त्याच्या डोळ्यांतसुद्धा पाणी भरून आले. खांद्याने डोळ्यांना चोळत कंठ दाटलेल्या आवाजात वाघ म्हणाला, "आता इथे क्षणभरसुद्धा थांबणं योग्य नाही. या संकेतांकडे आपण दुर्लक्ष नाही करू शकत. कोणत्याही वेळी काहीही होऊ शकतं!"

"समजू शकते" वाघिणीनेसुद्धा खांद्याने आपले डोळे पुसले. आपल्या अश्रूंना आवर घालत वाघीण म्हणाली, "हिच ती जागा, जिथं माझ्या आईनेसुद्धा मला जन्म दिला होता. वाघाकडे बघत ती म्हणाली, "माझ्या आईने सांगितले होते की, त्या रात्री पाऊस पडत होता आणि माझे वडील जंगलात कुठेतरी अडकले होते."

वाघाने मान वळवून गुहेच्या बाहेर बघितले. तेच सगळं दृश्य बाहेर दिसत होतं, जे तो रोज गुहेत बसून बघत होता. थंडीच्या दिवसांत ते त्या ठिकाणी नेहमी आपल्या कुटुंबियाबरोबर उन्हात बसत असत. आज बरोबर त्याच ठिकाणी ऊन पडलं होतं.



वाघीण मोठ्या जड अतःकरणाने गुहेतून बाहेर आली आणि तिने मुलांनाही बरोबर येण्याचा ईशारा केला. वाघाने सगळ्यात शेवटी गुहा सोडली. त्याच्या प्रत्येक श्वासात आपल्या गुहेचा वास अजूनही पूर्वीसारखाच ठासून बसलेला होता.

"अजून दिवसांचे काही प्रहर बाकी आहेत. चला अस्वलाकडे जाऊया!" वाघिणीने मान हलवत परत चहूकडे पाहिलं. आज तिला जंगल अगदी विचित्र वाटतं होतं. तिनं मान वर करून पाहिले. काळ्या काळ्या ढगांचे तुकडे आकाशात तरंगत होते. बोचरी थंडी पडली होती.

वाघ आपल्या कुटुंबाला घेवून जेव्हा अस्वलाच्या घरी पोहोचला तेव्हा अस्वल-दाम्पत्य गुहेच्या बाहेरच आपल्या मुलांवर प्रेम करत बसले होते. आई नेहमीप्रमाणे आपले दोन्ही पाय पुढे पसरवून बसली होती आणि एका बाळाला त्याच पायांवर झोपवून त्या बाळाकडे एकटक वात्सल्याने बघत होती. तसं म्हटलं तर बाळाने अजून डोळे उघडले नव्हते, त्यामुळे तो आईला बघू शकत नव्हता. दुसऱ्या बाळाला वडील आपल्या दोन्ही हातांनी पकडून आपल्या तोंड व नाकाला चिकटवत त्याच्या कोमल शरीराला येणारा दुधाळ वास घेत होते.

वाघाच्या कुटुंबाला पाहून अस्वल-दाम्पत्य सुरुवातीला आश्चर्यचकित झाले. नंतर अस्वल आपल्या मुलांना हवेत उडवत-उडवत म्हणाला, "निघताना मुलांना सोबत घेऊनच निघालात हे खूप चांगलं केलं तुम्ही." तो प्रसन्न होवून म्हणाला, "बरं झालं तुम्ही दोघं परत आलात. तुम्ही गेल्यानंतर आम्हा दोघांनासुद्धा करमत नव्हतं!"

इकडे अस्वल आपल्याच गोष्टीत मग्न होते. परंतु तिकडे वाघ आणि वाघिणीच्या चेहऱ्यावरील उदासीनतेत भीती दिसत होती. अस्वलिनीने शंकित होवून विचारले, "काय झालं? तुम्ही दोघे इतकं दुःखी आणि उदास का झालात?"

अस्वलिनीच बोलणं ऐकूण अस्वलाचं लक्षसुद्धा चिंताग्रस्त आणि दुःखी वाघ-दाम्पत्याकडे गेले. तसे त्याने लगेच विचारले. "सगळं ठीक आहे ना?"

"आम्ही सर्वजण तुमच्यासमोर आहोत म्हणजे सर्व ठीकंच आहे." वाघ एकदम मलूल आणि उदास हास्य करत म्हणाला, आणि शेजारी उभ्या असलेल्या वाघिणीकडे बघू लागला.

"अशाप्रकारे कोड्यात पाडू नका." अस्वलिन अस्वस्थ होत होती. "तुम्हा सर्वांचा अशाप्रकारे चेहरा पाहून माझ्या छातीत धडपड व्हायला लागलं आहे."

"तुम्ही बरोबरच विचार करीत आहात. सर्वकाही ठीक नाही!" वाघीण अस्वल आणि अस्वलिनीच्या चेहऱ्याकडे बघून घाबरलेल्या आवाजात बोलली. "आम्ही आमची गुहा कायमची पाठीमागे सोडून आलो आहोत!" असं घाबरलेल्या स्वरात म्हणत दुसरीकडे बघू लागली.

अस्वल-दाम्पत्याची तर जशी वाचाच बंद झाली. त्यांचे चेहरे भयभीत झाले. त्यांच्या तोंडातून शब्दही फुटेनासे झाले. वाघ आणि वाघीण जिथं उभे होते तिथेच ते बसले.



वाघाने हळूहळू सर्व हकीकत अस्वल परिवाराला सांगितली. अस्वल-दाम्पत्य स्तब्ध होवून सगळं ऐकत होते. काही क्षणांनंतर अस्वलाने एक दीर्घ श्वास सोडत त्या स्मशान-शांततेचा भंग केला. अस्वल काहीसा विश्वासाने म्हणाला, "काही हरकत नाही आमची गुहा तर आहे ना." नंतर अस्वलिनीकडे पाहात शांतपणे म्हणाला, "मी आणि वाघ गुहेच्या बाहेर पहारेदार म्हणून थांबतो आणि तुम्ही दोघी माता आपल्या मुलांबरोबर आत राहाल," असं म्हणतं अस्वल वाघ आणि वाघिणीकडे बघू लागला. जणू काही आपल्या विचारांवर त्यांच्या प्रतिक्रियेची वाट पाहू लागला होता.

वाघीण एकदम शांत बसली होती. तिने आपलं डोकं समोर पसरलेल्या दोन पायांच्या पंजांवर ठेवले होते. तिच्या चेहऱ्यावर निराशा आणि दु:ख स्पष्ट दिसत होतं. तिकडे वाघसुद्धा काळजीच्या ओझ्याने शून्यात एकटक पाहत होता. नंतर आपली नजर जमिनीकडे रोखत जड अंत:करणाने म्हणाला, "असं कसं होवू शकतं आपण सगळेच्या सगळे संकटात येऊ."

पुन्हा काही वेळासाठी बर्फासारखी निरव शांतता पसरली. वाघाने पुन्हा त्या शांततेचा भंग केला. असं वाटलं की त्याने मनातल्या मनात काही तरी निश्चय केला आहे. एक दृढ निश्चय...! वाघ म्हणाला, "आम्ही बाहेर जंगलातच राहतो. अस्वलावर आपली एक वाघाची पूर्ण निर्णयात्मक दृष्टी टाकत म्हणाला, "जेव्हा एखादी गुहा मिळेल तेव्हा बघू."

वाघाचं म्हणणं ऐकून अस्वल एकदम स्तब्ध झाला. अस्वलिनीने जणू काही अघटितच घडणार आहे, या कल्पनेनं आपल्या मुलांना पोटाजवळ कवटाळून घेतलं.

अस्वलाने वाघाला पराभूत होताना पाहिले आणि समोर येणाऱ्या भयंकर स्थितीचा सामना करण्याचे आवाहन करू लागला. "थंडीचे कठीण दिवस आले आहेत! डोंगरावरून बर्फासारखे थंडवारे वाहू लागले आहेत." नंतर मान वरती करून आकाशाकडे पाहून अस्वल म्हणू लागले, "असे वरती बघ जरा, आज किती काळे घनदाट ढग भरून आले आहेत!"

वाघ आणि वाघिणीने एकदम आकाशाकडे मान वर करून बघितले. काळे ढग आता एकत्र जमा झाले होते. थांबून-थांबून ढग गरजूही लागले होते.

अस्वलिन काहीशी दु:खी आणि घाबरलेल्या आवाजात म्हणाली, "थंडीच्या दिवसातील पाऊस कोणत्याही वेळी पडू शकतो आणि हा पाऊस हाड-मास एक करून टाकतो." नंतर एकदम अत्यंत दु:खी श्वास घेत अस्वलिन म्हणाली, "आणि अशा अवस्थेत या लहान मुलांना घेवून जंगलात राहण्याचे बोलत आहेस!"

"आम्ही अजून काय करू शकतो? एक वाघ शरणार्थी तर नाही बनू शकतं!" वाघ आपली प्रतिमा वाचवत होता आणि आतून कोलमडलाही होता. जंगलाकडे एक दु:खी नजरेने पाहत हळूच म्हणाला, "पण एक लक्षात घे की, आपण आपल्याच जंगलात अनाथ झालो आहोत."

वाघाचं म्हणनं ऐकून अस्वलाचं मन भरून आलं. त्याचे डोळे भरून आले. तो विचार करू लागला की खरचं अशी वेळ येऊ शकते, की जेव्हा एक वाघ स्वत:ला जंगलात अनाथ समजू शकतो.



अचानक अस्वलाने पाहिले की वाघ आपल्या कुटुंबाबरोबर उठून जाऊ लागला आहे आणि बाहेर पाऊस सुरू झाला आहे. बाहेर एकदम अंधारून येऊन पाऊस खूप भरून आला होता. अस्वल एकदम घाबरून वाघाला थांबवू लागले. "हे बघ! पावसाचे मोठे-मोठे थेंब पडू लागले आहेत आणि पाऊसही जोरात पडणार आहे. धुकंही पडू शकते!" तरीसुद्धा जेव्हा वाघ थांबेना तेव्हा तो जोरात ओरडला. "अरे! ऐकू येतं का?" असं मुलांना घेऊन बाहेर का जातोस?"

वाघ-दाम्पत्य न ऐकल्यासारखं करत होते. ते सगळेजण जंगलावरचा अधिकार सोडायला बिल्कूल तयार नसल्यासारखे हळूहळू चालत होते. अस्वल वळून रडवलेला होऊन अस्वलिनीला म्हणाला, "तू त्यांना थांबवत का नाहीस?"

अस्वलिन निष्क्रिय होवून दगडासारखी बसून राहिली होती. ती हमसून-हमसून रडत होती. आणि त्या हिरव्यागार जंगलाकडे बघत होती, जिथं आता वाघाचं कुटुंब हरवलं होतं आणि जिथल्या झाडाच्या पानांना मुसळधार पाऊस धुऊन काढत होता. तेव्हा ती एकदम हताश होवून मागे वळली आणि अस्वलाच्या खांद्यावर डोकं ठेऊन ओक्साबोक्शी रडू लागली.



